**पिंपरी चिंचवड महानगरपालिकेच्या विविध विकास प्रकल्प योजनेसाठी हरित कर्ज/ कर्जरोखे उभारण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- पीसीसी-२०२४/प्र.क्र.४२०/नवि-२२**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
**दिनांक :- १३ फेब्रुवारी, २०२५**

**संदर्भ :-**

आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. लेखा/१३/कावि/१३१/२०२४, दिनांक २२ जुलै,२०२४.

**प्रस्तावना :-**

पिंपरी चिंचवड महानगरपालिका परिसरातील विविध हरित प्रकल्पांसाठी मनपा हरित कर्जरोखे उभारणे व त्यानुषंगाने नेमण्यात आलेल्या मध्यस्थ संस्थेमार्फत कामकाज पार पाडण्यासाठी प्रारंभिक टप्प्यात रु. २०० कोटी कर्ज/कर्जरोखे स्वरुपात उभारण्यास तसेच अधिक रकमेची आवश्यकता असल्यास गरजेनुसार अतिरिक्त कर्ज/कर्जरोखे उभारण्यास महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, कलम १०९ नुसार मान्यता देण्याचा प्रस्ताव आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका यांनी संदर्भाधीन पत्रान्वये शासनाकडे सादर केला होता. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पिंपरी चिंचवड महानगरपालिकेच्या शहरातील नॉन-मोटाराइज्ड ट्रान्सपोर्टेशन आणि इतर हरित प्रकल्पांना निधी उपलब्ध करून देण्याकरिता ₹ २०० कोटी (ग्रीन शू पर्याय म्हणजे आयपीओ नंतर शेअरची मागणी वाढल्यास स्टॉकच्या किमतीला स्थिरता मिळवून देण्याचा उद्देश असलेल्या पर्यायासह) पिंपरी चिंचवड महानगरपालिकेकडून निधी उभारण्यात येत आहे. त्यानुषंगाने हरित कर्ज/कर्जरोखे उभारण्यासाठी आवश्यक असलेल्या सर्व बाबींसह येणाऱ्या प्रत्यक्ष खर्चास स्थायी समिती सभा ठराव क्र.३६९३, दि.०९/०७/२०२४ व मा. महापालिका सभा ठराव क्र.६२९, दि.१६/०७/२०२४ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. त्यास अनुसरून सदर प्रकल्पाच्या अनुषंगाने प्रारंभिक टप्प्यात रुपये २०० कोटीपर्यंत कर्जरोखे उभारण्यास महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम कलम १०९ नुसार या कलमामधील अटी व खालील अटींसह राज्यशासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१. प्रत्यक्ष प्रकल्प उभारणीसाठी यापेक्षा अधिक रकमेची आवश्यकता असल्यास त्याप्रमाणे कर्ज/कर्जरोखे उभारणे आवश्यक असल्यास अतिरिक्त कर्जरोखे उभारण्यासाठी पिंपरी चिंचवड महानगरपालिकेकडून शासनाकडे स्वतंत्र प्रस्ताव सादर करण्यात यावा.

२. कर्जरोख्यांच्या परतफेडीसाठी महानगरपालिकेने राष्ट्रीयकृत बँकेत Escrow खाते उघडून परतफेड वेळेत होईल याची दक्षता घ्यावी.

३. रोख्यांद्वारे उभारण्यात येणारी कर्ज रक्कम आणि त्यावरील व्याज परतफेड करण्याची जबाबदारी पूर्णतः पिंपरी चिंचवड महानगरपालिकेची असेल आणि याबाबत शासनाची कोणतीही हमी राहणार नाही.

४. कर्जरोख्यांची उभारणी व त्याची परतफेड याबाबतचा अहवाल पिंपरी चिंचवड महानगरपालिकेने वेळोवेळी शासनास सादर करावा.

५. ज्या प्रयोजनासाठी कर्ज रोखे उभारण्यात येणार आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा उपयोग करणे आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका यांना बंधनकारक राहील.

६. सदर प्रकल्पाच्या मान्यतेनंतर सर्व कायदेशीर बाबींची पूर्तता करणे बंधनकारक राहील. तसेच, केंद्रशासन व राज्यशासन यांच्या संबंधित विभागांनी निश्चित केलेल्या विविध नियम, विनियम, अटी व शर्ती यांची पूर्तता केल्यानंतरच पुढील आवश्यक कार्यवाही करणे बंधनकारक राहील.

७. पिंपरी चिंचवड महानगरपालिकेस प्रारंभिक टप्प्यात रुपये २०० कोटी रक्कमेच्या मर्यादेत कर्ज उभारणेस शासनाची ना हरकत दिली असली तरी, कर्जाची प्रत्यक्ष उचल आवश्यकतेनुसार करण्यात यावी.

८. सदर कर्ज निधीची व यापूर्वी उभारलेल्या कर्ज निधीची परतफेड विहित कालावधीमध्ये करणेबाबत कार्यवाही करणे पिंपरी चिंचवड महानगरपालिकेला बंधनकारक आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०२१३१६५९०४५२२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नावाने,**

C PRIYANKA

Digitally signed by C PRIYANKA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2295c5c50b6a2aa03b2654fd2f5f69a709a20ae44359c483f3e1b0d4450728d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=55FDD77FA8877B50FD182206F763C590C30CE698809F79D37B145FD63E375059, cn=C PRIYANKA
Date: 2025.02.13 17:00:26 +05'30'

**( प्रियांका कुलकर्णी-छापवाले)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.उपमुख्यमंत्री, नगर विकास विभाग यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यमंत्री, नगर विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
५) आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे.
६) निवडनस्ती (नवि-२२).